# गोमागणेश पितळीदरवाजा

यांचें

# लहानसें ' आत्मचरित्र.

---


लेखक,

**के. मो. पंडित.**

[illegible]ादकः—(१) आर्यावर्त–धुळें, (२) प्रबुद्ध महाराष्ट्र–पुणें.

(३) उपाध्यापक महाराष्ट्र वैदिक इंग्रजी शाळा–धुळें.



प्रकाशक,

**अनंत गणेश शेकदार.**

मुक्काम बडोदें.

---

किंमत २ आणे.

श्री.

# प्रस्तावना आणि अर्पण.

ग्रंथसंपादक आणि प्रसारक मंडळी—बडोदें, यांच्या जाहीरातीवरून पुढील वृत्तांत लिहिला आहे. तो त्यांस पसंत पडला- आणि त्यांनीं छापून प्रसिद्ध केला. यांतील सारें कर्तृत्व त्या मंडळीकडेच आहे. सबब त्या मंडळीसच हें पुस्तक अर्पण करणें योग्य वाटलें. होतकरू लेखकांस उत्तेजन देणाऱ्या या कर्तव्यतत्पर संस्थेचा सर्वदा उदय असो, एवढेंच देवाजवळ मागणें आहे.

मुक्काम धुळें,
मिती श्रावण वद्य १
शके १८२५.

के. मो. पंडीत.

# विषयानुक्रमणिका.

# गोमागणेश-पितळी दरवाजा
## यांचें
## 'लहानसें' आत्मचरित्र.

### प्रकरण १ लें.

### "बारामती."

माझा जन्म जरी बारामतीस झालेला नाहीं, तरी हा गांव मला जन्मभूमीप्रमाणें प्रिय वाटतो. याचें कारण, माझें सर्व बाळपण व बहुतेक लहानपण या गांवींच गेलें. माझ्या देशाच्या इतिहासांत या गांवाची प्रसिद्धि आहे; यामुळेंही तो गांव मला फार प्रिय वाटतो. माझ्या चरित्रास याच गांवापासून प्रारंभ होतो. म्हणून या प्रकरणांत त्याची संक्षिप्त माहिती देण्याचें योजिलें आहे.

बारामती हा गांव पुणें जिल्ह्यांत भीमथडी तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. 'भीमथडीचीं

तहे' महाराष्ट्रीय इतिहासवाचकांस ठाऊक असती-
लच. याच लहानशा बटांवर बसून मराठ्यांनीं
आरबी घोड्यावर बसणाऱ्या इमामदांडग्या मुसल-
मानांचा पाठलाग केला. 'मूर्ति लहान पण कीर्ति
मोठी ' हा न्याय आमच्या या भीमथडीच्या बटांस
व त्यांवरील स्वारांस चांगला लागू पडतो. अल्प
मुशाहिरा घेऊन स्वदेशाच्या स्वातंत्र्यार्थ लढणाऱ्या
तेजस्वी शिलेदारांस या इमानी व अल्पसंतुष्ट
जनावरांची फार चांगली मदत होती. किती
जीवापाड श्रम करून मराठ्यांचे 'गंगेस घोडे न्हाले'
याची कल्पना आपणांस कदापि यावयाची नाहीं.
त्याचप्रमाणें, भीमथडीच्या तट्टांस सिंधु नदाचें पा-
णी पाजून मराठ्यांनीं आपल्या पराक्रमाची जी
शर्थ केली, त्या श्रमाचाही अंदाज करणें कठीण
आहे. अन्योन्यकर्तव्यतत्पर असे ते घोडे व त्यां
च्यावरील मराठे स्वार हे दोघेही धन्य होत!

आतां खुद्द बारामती विषयीं. हा गांव फार
जुना असावा, असें त्याच्या इतिहासांतील उल्ले-

त्यावरून दिसतें. शिवाजी महाराजांच्या पूर्वी हा गांव सुपें परगण्यांत मोडत होता. त्यावेळेस याची इतकी प्रसिद्धि नव्हती. याला रम्य स्वरूप व प्रसिद्धि पेशवाईंत आली. येथील जहागीरदार पेशव्यांचे संबंधी 'बाबूजी नाईक' हे होत. यांनींच नदीच्या अलीकडे पेठ वसविली. तिची रचना 'सोंगट्याचे' पटाप्रमाणें केलेली आहे. यामुळें, पहाणारास मोठी मौज वाटते. अशी रचना जयपुराशिवाय इतरत्र फारशी पहावयास सांपडत नाहीं. चार राजरस्ते एके ठिकाणीं मिळतात व त्या ठिकाणीं उभे राहिलें असतां लांबवर चहूंबाजूंस चार वेशी दिसतात. यांचा वाडाही पुण्यांतील शनवारच्या वाड्याएवढा आहे. त्यांत हल्लीं सरकारनें कचेऱ्या केलेल्या आहेत. त्या वाड्यांतील जुन्या इमारती कांहीं वर्षांपूर्वी किर्र झाडींत व श्वापदांच्या सहवासांत जमीनदोस्त होऊन पडलेल्या दिसत. हा वाडा मोठा रमणीय होता, असें वृद्ध लोक सांगतात. पण, काळगतीनें कोणाकाही

सोडलें नाहीं. ज्या वाड्यांत गजान्त लक्ष्मी नांदत असे, तेथें दिवसा जाण्यास भीती वाटावी! आणि हा सर्व पन्नासपाउणशें वर्षांतला खेळ! तस्मात् हेंच खरें कीं, 'सर्व यस्य वशादगात् स्मृतिपथं कालाय तस्मै नमः'!!

हे जहागीरदार मोठे हौशी, श्रीमंत व रासिक होते असें दिसतें. गांवाची रचना, त्यांच्या वाड्याविषयीं आख्यायिका, व तेथील सिद्धेश्वराचें देऊळ हीं त्यांच्या हौशीची साक्ष देतात. ते पेशव्यांचे सावकार होते; यावरून, ते श्रीमंत होते, याचा प्रत्यय येतो. आणि माहाराष्ट्रकविकुलगुरु मयूरपंत ह्यांस त्यांनीं आपल्या आश्रयास ठेविलें होतें, यावरून, त्यांची रासिकताही उघड होते.

येथील सिद्धेश्वराचें देऊळ चिरेबंदी असून भव्य आहे. देवळांत पाहण्यासारखी चीज ह्मटली ह्मणजे देवापुढील 'नंदी' होय. खरोखरीच्या नंदीबैलाएवढा हा नंदी आहे; व तो कारागिरानें इतका सुबक घडविला आहे कीं, तो अचेतन आहे, असें

वाटतच नाहीं. त्याजकडे टक लावून उभें रहावें ह्मणजे त्या मनोहर मूर्तीशीं मनुष्य तन्मय होऊन जातो. याविषयीं वृद्ध लोक जी आख्यायिका सांगतात, ती तर मोठीच अचंबा करण्यासारखी आहे. बारामतीस नाईकांचे कारकीर्दीत हा कारागीर होऊन गेला. त्यानें पहिल्यानें जो नंदी केला होता, तो हल्लींच्याहूनही सुबक होता. तो स्थापन केल्यावर पुष्कळ लांबलांबचे लोक येऊन त्यास पाहून गेले. त्यांत एक मनुष्यरूपी घुबड आलें. त्याच्या मत्सरी दृष्टीला हा चांगुलपणा सहन झाला नाहीं. त्या मत्सरी दृष्टीचें काय दुष्ट सामर्थ्य पहा! तिनें तो सुंदर नंदी भंगला आणि कारागिराचा उजवा हात लुला पडला! ही खेदजनक बातमी जिकडे तिकडे एखाद्या वणव्यासारखी पसरली. सर्व लोक त्या बिचाऱ्याकरितां हळहळूं लागले. पण गुणी मनुष्यास काय ईर्षा असते पहा! त्यानें त्या दुष्ट दृष्टीचा धिक्कार केला व डाव्या हातानें दुसरा नंदी घडवून आपली अजब करामत सर्व जगास

जाहीर केली ! तें पाहून त्याच्या धन्यास किती धन्यता वाटली असेल व लोकांनीं त्याची किती तारीफ केली असेल, याची नुसती कल्पना सुद्धां हृदयांत आनंदीआनंद करून सोडते.

महाराष्ट्रकविकुलगुरूंचें वास्तव्याचें गांव हेंच. त्यांच्या बैठकीची खोली अद्याप दाखवितात. तिच्या भिंतीवर चहूं बाजूंला यमकांची सृष्टि चितारलेली अस्पष्टपणें दिसून येते. नदीच्या कांठीं असलेल्या गणपतीच्या देवळांतही कधीं कधीं ते बसत असत आणि कविता अडली म्हणजे त्याजपुढें ठेवून ती पुरी होण्यासाठीं ते प्रार्थना करीत.

दुसरे कवि 'श्रीधरस्वामी' यांचेंही वास्तव्य या गांवीं कांहीं दिवस होतें. 'श्रीशिवलीलामृत ग्रंथ' आद्यंत त्यांनीं येथें श्री विश्वेश्वराचे देवालयांत तयार केला.

तिसरे ऐतिहासिक प्रसिद्ध पुरुष 'गोविंदराव काळे' हे होत. यांचें वास्तव्याचें गांव हेंच. हे पेशव्यांचे तर्फे निजामाचे दरबारीं वकील होते.

हे मोठे तेजस्वी, करारी व शूर होते. खर्ड्याच्या लढाईची उठावणी यांनींच केली व श्रीमंतांचा उपमर्द करणाऱ्या मश्रूनमुलखाची खोड यांनींच जिरविली. इंग्रजांचें धरणें आलें असतां यांनीं हिरकणी चावून प्राण सोडला व आपलें शवही त्यांचे दृष्टीस पडतां कामा नये, अशा प्रकारची तजवीज केली.

याप्रमाणें ऐतिहासिकदृष्ट्या या गांवाचें पर्यालोचन झालें. आतां ज्या वेळेस आमच्या गोष्टीस प्रारंभ होतो, त्या वेळेस त्याची काय स्थिति होती, याचें थोडेसें वर्णन करून हें प्रकरण आटोपूं.

शके १८०३ च्या सुमारास आह्मी बारामतीस आलों, त्या वेळेस तो पेटयाचा गांव होता. गांवांत म्युनिसिपालिटीही होती. गांवाची राहणी बाळबोध व जुन्या चालीची होती. स्टेशनापासून हा गांव नऊ कोस दूर असल्यामुळें 'नवीन' वारें त्याला मुळींच लागलेलें नव्हतें. चैनीच्या वस्तु त्यास माहीत नव्हत्या. 'सुधारणा' आणि 'वर्तमानपत्रें'

यांचें तेथें नांवही ऐकूं येत नसे. 'व्याख्यान' हा शब्द तेथें कधीं ऐकलेला आठवत नाहीं. 'सभा' झालेल्या कधीं माहीत नाहींत. पण, याचे उलट कथाकीर्तनें, चातुर्मास्यपुराण, उत्सव, मंत्रजागर, सणवार वगैरे जुन्या संस्थांचा वारंवार जयजयकार होत असे. गांवांतील लोक एकीनें रहात असत. जो तो आपापल्या कामामध्यें निमग्न असे. दुष्काळ किंवा प्लेग यांचा संसर्ग नसल्याकारणानें लोक सुखांत होते. ते शांत पवित्र व साधे दिवस मला अजून चांगले आठवतात. अजून ते विचार माझे मनांत आले ह्मणजे मी कित्येक वेळपावेतों देहभान विसरून जातों. असे दिवस पुन्हां येतील तर बरें अशी मनाला उत्कंठा वाटूं लागते.

प्रत्येक लहान गांवांत एक ' अधिकारी पंचायतन ' असतें, त्याप्रमाणें येथेंही होतें. माझे वडील त्या अधिकारी पंचायतनांतील एक दैवत होते, एवढें सांगणें तूर्त पुरेसें आहे.

गांवांत व्यापाराची पेठ साधारणच असे. भाजी-

पाला यथातथाच मिळे. तथापि गुरुवारीं बाजार भरे. तेव्हां सर्व प्रकारचा माल चांगला, व स्वस्त मिळे. आंब्यांच्या दिवसांत आंबे, पेरूंच्या दिवसांत पेरू व शेंगांच्या दिवसांत शेंगा मुबलक खावयास मिळत. बारामतीचे रेशमी धोतरजोडे फार प्रसिद्ध आहेत. यामुळें, कोष्टयांचा भरणा तेथें मोठा आहे.

## प्रकरण २ रें.

### "पूर्वपीठिका."

या प्रकरणांत आमची पूर्वपीठिका कथन करावयाची आहे. आमचें मूळ गांव 'नाशीक' हें होय. आमचे आजे, पणजे व निपणजे येथेंच उदयास आले. निपणजे व पणजे यांनीं स्वराज्यांत मामलत करून मोठी कीर्ति संपादन केली. त्याचप्रमाणें चुलत आजे यांनीं अव्वल

इंग्रजींत मामलत करून मोठें नांव कमाविलें. 'विष्णु गोपाळां'चें नांव ठाऊक नाहीं, असा नाशिक जिल्ह्यांत वृद्ध मनुष्य सांपडणें कठीण. त्यांचा स्वभाव पराकाष्ठेचा प्रेमळ व कोंवळा असे. कोणालाही दुखवावयाचें नाहीं, अशी त्यांची वर्तणूक असे. लहान मुलें त्यांना फार प्रिय असत. संध्याकाळचे वेळेस कचेरींतून येऊन ते गच्चीवर बसले ह्मणजे त्यांजभोंवतीं आळींतील बाळगोपाळ जमावयाचे. मुलांशीं त्यांचें अतिशय लडिवाळपणाचें वर्तन असे. त्यांजकरितां फळफळावळ किंवा मेवामिठाई ते रोज आणून ठेवीत. त्यांचें खेळणें व गंमती करणें झाल्यानंतर त्यांना ते खाऊ देऊन वाटेस लावीत. नंतर संध्येची वेळ होई. घराची गच्ची गंगेच्या बाजूला असल्याकारणानें तेथून घाटावरची शोभा फारच मनोहर दिसे. जिकडे तिकडे देवळांतील घंटारव व चौघडे यांनीं सर्वत्र गजबजून जाई; घांटांवर संध्येसाठीं आसनें टाकून ब्रह्मवृंद ध्यानस्थ बसलेला नजरेस येई; गुरें

रानांतून परत येत; मुलें शाळांतून सुटत; देव-दर्शनासाठीं लोकांची गर्दी होई; व सूर्याची अप्रतिम शोभा पाहून पराकाष्ठेचा आनंद होई.

त्यांची एक बाग असे. तींत पुष्कळ फुलें निघत. तीं आळींत वाटलीं जात असत. पाटावर वाटे करून ठेवलेले असावयाचे. त्याचप्रमाणें दूधदुबतें आणि आंबराईतील आंबे यांचा आळींतील लोकांना मोठा आश्रय असे.

सरकारी कामांत ते मोठे दक्ष व निःपक्षपाती असत त्यांनीं तेथील बालाजीचें चोरीस गेलेलें जवाहीर शोधून परत आणिलें. यामुळें त्यांचा तेथें फार लौकिक झाला. हरिदास, शास्त्री, पुराणिक व वैदिक यांस त्यांचा चांगला आश्रय असे.

आमचे सख्खे आजे केवळ स्नानसंध्या करून कालक्रमण करीत. त्यांनीं डोक्याला पागोटें घातलेलें कोणास आठवत नाहीं. त्यांचें पाहटे तिनि वाजतांचें स्नान कधीं टळलें नाहीं. आजारी जरी झाले तरी त्यांच्या नियमांत मरेपावेतों कधींही

अंतर झालें नाहीं. ते मोठे कडक स्वभावाचे असत. त्यांचा घरांत मोठा दरारा असे. पहाटे सर्व मंडळींनीं उठून स्नानें केलींच पाहिजेत. उजाडल्यावर कोणीही पारोसें रहावयाचें नाहीं. अशा तऱ्हेनें त्यांचा काल केवळ पवित्र धर्माचरणांत उत्तम तऱ्हेनें गेला.

आमच्या पूर्वपीठिकेंतील तिसरें वर्णनीय पात्र आमच्या आजोबाची बहीण ही होय. आत्याबाईवर आकाशांतील कुऱ्हाड अल्पवयांतच पडली होती. पण, त्यांनीं आपल्या आयुष्याचें चीज फार उत्तम केलें. 'संन्यासिनी'नें ज्याप्रमाणें आयुष्य घालवावें, त्याप्रमाणें त्यांनीं आपलें आयुष्य घालविलें. त्यांची स्वच्छता, त्यांचें पवित्राचरण, त्यांचीं व्रतवैकल्यें यांविषयीं मी गोष्टी ऐकूं लागलों, ह्मणजे असें वाटतें कीं, ही एक 'योगिनी'च होऊन गेली असावी. कोण दृढनिश्चय! किती स्वधर्मपरायणता!! आणि केवढें पवित्राचरण!!! अशीं माणसें या काळांत पाहूं ह्मटल्यानें मिळावयाचीं नाहींत.

आमच्या दोघी आजींपैकीं नवऱ्याच्या तोलाला शोभेल अशी एकही नव्हती. सामान्य व्यवहारांतील स्त्रियांपैकीं त्या अल्पदृष्टी व अज्ञान होत्या.

हे दोन्ही आजोबा आमच्या वडिलांच्या अल्पवयांत वारले. यामुळें कुटुंबसंगोपनाचें ओझें आमच्या दुसऱ्या चुलत आजोबांवर पडलें. त्यांचा स्वभाव मात्र मोठा मासलेवाईक व वर्णन करण्यासारखा होता. त्यांना विद्या थोडी होती; पण त्यांचें नशीब मोठें जबर होतें. यामुळें तीनशें रुपयांपर्यंत ते लवकर व सहज वाढले. पण त्यांची अव्यवस्था इतकी पराकाष्ठेची होती कीं, कांहीं पुसूं नये. तीनशें रुपयांची नुसती चटणी उडून जावयाची. या 'अव्यवस्थितपणां'त 'तऱ्हेवाईकपणा' व 'रंगेलपणा' यांची भर पडली होती. या तीन गुणांचें त्रिकूट जमल्यावर मग परिणामाला काय पहावयाचें! चंडीची अवस्था! आज कुलस्वामिनीचा उत्सव टोलेजंग करावयाचा

इतकें मनांत येण्याचा अवकाश; मग, त्या वर्षी काय विचारतां? खर्चाकडे काडीइतकें बघावयाचें नाहीं. पण, दुसऱ्या वर्षी काय? देकीला नुसती माळ मिळण्याची मारामार! हीच स्थिति सर्वत्र. त्याचा पाल्हाळ करणें नको. याचा शेवट उघडच आहे. सर्व तऱ्हेची वडिलार्जित जिनगी गहाण पडून नाहींशी झाली, आणि वर कर्जदारांचे पुन्हां तगादे!

अशा स्थितींत वडिलांचें शिक्षण यथातथाच झालें. घरांतील 'आण ने, पुजा अर्चा, नैवेद्य वैश्वदेव' यांतच त्यांचा बहुतेक वेळ जावयाचा. त्यांतून वेळ राहील तो अभ्यासास! पण तो देखील आजोबांच्या तऱ्हेवाईकपणामुळें वांट्याला यावयाचा नाहीं. अभ्यास करीत असतां त्यांस कांहीं काम सांगून पिटाळावयाचें. धड पुस्तकें किंवा फी कधींही मिळावयाची नाहीं. बऱ्याबोलानें एकही दिवस जात नसे. अशा असह्य स्थितींत दिवस काढणें ह्मणजे पूर्वजन्मींचें भयंकर पातक होय.

अशा स्थितींत वडिलांचा म्याट्रिक्युलेशनपर्यंत अभ्यास झाला. इतक्यांत आजोबांची अशी लहर लागली कीं, आतां शिक्षण पुरें करून त्यांस एखादी असामी लावून द्यावी. त्याप्रमाणें त्यांनीं १५रु. दरमहाची नोकरी लावून दिली आणि त्यांस वेगळें काढलें.

येथपर्यंत अविभक्तकुटुंबपद्धति चालू होती. यानंतर विभक्तपणा आला. पोटाच्या मागें आमचे वडील बदली होईल तिकडे भटकले. वडिलार्जित जिनगी पहावयास त्यांस वेळ व आशा राहिली नाहीं. आतां विभक्त झाल्याकारणानें दहा दहा वर्षांत घरच्या मंडळींच्या गांठी पडणें त्यांस मुष्कील झालें.

अविभक्तकुटुंबपद्धति किती श्लाघ्य व श्रेष्ठ आहे, याचा नमुना जुन्या घरंदाज घराण्यांत पहावयास मिळे; त्याचें वर्णन आरंभीं आमच्या पूर्वपीठिकेंत आलेंच आहे. सुबत्ता व श्रेष्ठ मनोवृत्तींचें प्राबल्य यामुळें अविभक्तकुटुंबपद्धति प्रचारांत आली.

बदललेल्या परिस्थितींत ती श्रेष्ठ शाळा, तींतील शिक्षण व शिस्त यांस आह्मी दुर्दैवी मुकलों !

आतां यानंतर आमचें कुटुंब पुण्यास वेगळ्या घरीं राहूं लागलें. नदीचा उगम जसा अल्प असतो, तसेंच संसाराचें असतें. त्या वेळेस आमच्या कुटुंबांतील माणसें सारीं ' इन्‌मीन तीन ! ' वडील, मातुश्री व आजी. तसाच पगारही रुपये पंधरा. नदीचें पात्र जसें वाढतें, तसें तिचें स्वरूप व वैभव पालटतें. तसा संसार जसा वाढतो, तसें त्याचें स्वरूप व वैभव पालटतें. ही गंमत मोठी बघण्यासारखी आहे. ' संसार करंगळीहून बारीक आणि मुसळाहूनही जाड आहे, अशी ह्मण आहे, ती कांहीं खोटी नाहीं. पैपासून लाखो रुपयांपर्यंत जेवढी प्राप्ति होईल, तेवढी त्यांत आटते. एकच ' आणा ! ' पण तो एकदां पाठीस लागला ह्मणजे कधीं संपत नाहीं. सर्व आणा ! माती आणा, दगड आणा, घोंडे आणा. कांहीं आणूं नका, असें कधीं झालें आहे काय ?

पर्वतापासून निघणारा जलौघ जसा स्वैर व स्वतंत्र असतो, तसा तरुण मनुष्य संसाराचे प्रारंभीं होय. केवळ 'स्वतः' ही कल्पना मनांत प्रबळ असते. तारुण्याचा 'मद' वर्तनांत आणि विचारांत स्पष्टपणें दिसतो. कोणाची पर्वा वाटत नाहीं. बायको किंवा आई आपल्या शब्दाप्रमाणें वागली तरच ठीक; नाहींतर कामास पडावयाचें नाहीं. स्वच्छपणा, डौल आणि दिखाऊपणा इकडे सारें लक्ष वेधलेलें असावयाचें. आपल्या चैनींतून पैसे उरले तर शिल्लक पडावयाचे; नाहींतर त्याविषयीं फिकीर करावयाची नाहीं. बायको किंवा आई यांच्या गरजांकडे क्वचित् लक्ष द्यावयाचें. वात्सल्य आणि सात्विक प्रेम यांचा तारुण्यांतील मदापुढें चुराडा उडून जातो.

तारुण्यांत विचारी पुरुष फार विरळा. गृहशिक्षण उत्कृष्ट मिळून स्वभाव सात्विक वृत्तीचा असेल, तरच तारुण्यांत पुरुष सौम्य व विचारी निपजतो. आमच्या वडिलांच्या गृहशिक्षणाची

फारच हेळसांड झाली. लहानपणीं त्यांचा स्वभाव फार उनाड असे. गंगेंत प्रहर प्रहर पोंहत बसावयाचें, व वाळूंत दांडगाई करावयाची, अशा स्वैरपणांत सर्व लहानपण निघून गेलें. वडील व चुलते लवकरच वारल्याकारणानें वेदाध्ययन किंवा शाळा यांपैकीं कोणत्याही अध्ययनाचें वळण पाठीमागें लावणारें कळकळीचें माणूस नाहींसें झालें. बायकामाणसांचें उनाड मुलगा कुठलें ऐकणार? पुढें तऱ्हेवाईक चुलत्याच्या कारकीर्दींत तर 'बेबंद नगरी व झोटिंग पाच्छाई' होऊन विचारपूर्वक शिक्षणाची पूर्णपणें निराशाच झाली. यामुळें वर वर्णन केल्याप्रमाणें वडिलांचा स्वभाव व्हावा, हें स्वाभाविकच आहे.

वडिलांना नोकरी लागल्यावर लवकरच त्यांची बदली दूर अंतरावर दक्षिण कोंकणांत झाली. देशावरचा माणूस केवळ 'ताकभात' खाणाऱ्या नीरस मुलखांत जाऊन पडावयाचा ह्मणजे त्याला ती एक काळ्यापाण्याची शिक्षा होय. पोट तर

जाळलें पाहिजे; यासाठीं पाठवितील तेथें जाणें भाग आहे. वडिल कोंकणांत गेल्यावर त्यांना दूध पोळी, इत्यादि पौष्टिक वस्तु मिळेनात. त्यामुळें त्यांच्या तालमीच्या शरीराची फार खराबी झाली. प्रथम ते सडेच गेले होते. मागाहून इतर मंडळी गेली.

—दक्षिण कोंकणांतील आयुष्य ह्मणजे एक प्रकारची गंमतच आहे. देशावरची मौज जरी तिथें नाहीं, तरी पण तेथील राहणी व तेथील भाषा ही एक प्रकारें प्रेक्षणीय आहे. प्रत्येक शब्दावर अनुस्वार देण्याची तेथील पद्धत पाहून वारंवार हंसूं येतें. पण या भाषेचा नवीनपणा एकदां नाहींसा झाला ह्मणजे अपरिचिताच्याही ती अंगवळणीं पडून जाते व न कळत तोही तसेंच बोलूं लागतो. तेथली साधी रहाणी, मेहनती स्वभाव व धार्मिक वर्तन यांचा आमच्या कुटुंबावर चांगलाच परिणाम झाला. पुढें जगांत पसरणाऱ्या या कुटुंबास ‘कोंकणी रीत’ ह्मणजे एक उत्कृष्ट शिस्तीचें शिक्षणच मिळालें.

आमची आई तेथील एका शेजाऱ्याची हकी-कत सांगते, ती मोठी मौजेची आहे. तो गृहस्थ भिक्षुक होता. तेथें मराठी व इंग्रजी शाळा नवीन-च झाल्या होत्या. त्यांत त्याचीं मुलें जात असत. पण तीं घरीं आलीं ह्मणजे त्या गृहस्थानें त्यांना कपडे एकीकडे ठेवण्यास सांगून त्यांच्या अंगावर दोन तांबे पाणी घालावयाचें व मग त्यांस घरांत येऊं द्यावयाचें! त्यास दिवसेंदिवस वाढत जाणारा शूद्रादिकांचा भ्रष्टाकार पाहून मोठा संताप येई. मुलांना रोज ही शिक्षा व्हावयाची! यामुळें तीं कंटाळूं लागलीं. घरांतील बायकामाणसें मग भट्टजीची नजर चुकवून त्यांस आंत घेऊं लागलीं; ही स्नानाची चाल कांहीं दिवसांनीं मागें पडली. तिचें काम केवळ गोमूत्र शिंपडण्यानें होऊं ला-गलें. त्यालाही कांहीं दिवसांनीं रजा मिळाली; आणि स्पर्शास्पर्शाचा विटाळ नाहींसा झाला.

सुमारें ९ वर्षें कोंकणांत काढल्यावर देशावर बदली होईल तर बरें, अशी उत्कंठा आमच्या

वडिलांस वाटूं लागली व त्यासाठीं जारीनें प्रयत्न सुरूं झाले. हें तेथील वरच्या अधिकाऱ्यास खपेना. त्यानें यांच्याविरुद्ध जाण्याचा निश्चय केला. तेव्हां यांना शेवटीं रजा घ्यावी लागली. रजा संपली तरी वरचे ग्रह बदलले नाहींत. त्यांना आतां तर जास्तच चेव आला. वडील कामावर रुजू झाले. तेव्हां दोहींपक्षीं मोठी चुरस लागली. कोण जिंकतो हें सांगणें मोठें कठीण होतें. कांहीं दिवसांनीं त्या ग्रहांनीं यांच्यावर चांगलेंच किटाळ रचण्याचा घाट घातला. तेव्हां आमच्या कुटुंबांत मोठी चिंता उत्पन्न झाली. आमचे शेजारीं एक ज्योतिषी रहात होते. त्यांनीं वडिलांस धीर देऊन सत्याची बाजू ईश्वर स्मरून पाळण्याविषयीं उत्तेजन दिलें व अनुकूल काळा-विषयीं आशा उत्पन्न केली. त्या आशेच्या जो-रावर आमचें कुटुंब परमेश्वराच्या कृपेचा धांवा करीत होतें; इतक्यांत परखात्यांतला कोंकणी मनुष्य वडिलांच्या जागेवर येऊं इच्छीत होता,

आमची आई तेथील एका शेजाऱ्याची हकी- कत सांगते, ती मोठी मौजेची आहे. तो गृहस्थ भिक्षुक होता. तेथें मराठी व इंग्रजी शाळा नवीन-च झाल्या होत्या. त्यांत त्याची मुलें जात असत. पण तीं घरीं आलीं ह्मणजे त्या गृहस्थानें त्यांना कपडे एकीकडे ठेवण्यास सांगून त्यांच्या अंगावरं दोन तांबे पाणी घालावयाचें व मग त्यांस घरांत येऊं द्यावयाचें! त्यास दिवसेंदिवस वाढत जाणारा शूद्रादिकांचा भ्रष्टाकार पाहून मोठा संताप येई. मुलांना रोज ही शिक्षा व्हावयाची! यामुळें तीं कंटाळूं लागलीं. घरांतील बायकामाणसें मग भट्टजीची नजर चुकवून त्यांस आंत घेऊं लागलीं; ही स्नानाची चाल कांहीं दिवसांनीं मागें पडली. तिचें काम केवळ गोमूत्र शिंपडण्यानें होऊं लागलें. त्यालाही कांहीं दिवसांनीं रजा मिळाली; आणि स्पर्शास्पर्शाचा विटाळ नाहींसा झाला.

सुमारें ९ वर्षें कोंकणांत काढल्यावर देशावर बदली होईल तर बरें, अशी उत्कंठा आमच्या

वडिलांस वाटूं लागली व त्यासाठीं जारीनें प्रयत्न सुरूं झाले. हें तेथील वरच्या अधिकाऱ्यास खपेना. त्यानें यांच्याविरुद्ध जाण्याचा निश्चय केला. तेव्हां यांना शेवटीं रजा घ्यावी लागली. रजा संपली तरी वरचे ग्रह बदलले नाहींत. त्यांना आतां तर जास्तच चेव आला. वडील कामावर रुजू झाले. तेव्हां दोहींपक्षीं मोठी चुरस लागली. कोण जिंकतो हें सांगणें मोठें कठीण होतें. कांहीं दिवसांनीं त्या ग्रहांनीं यांच्यावर चांगलेंच किटाळ रचण्याचा घाट घातला. तेव्हां आमच्या कुटुंबांत मोठी चिंता उत्पन्न झाली. आमचे शेजारीं एक ज्योतिषी रहात होते. त्यांनीं वडिलांस धीर देऊन सत्याची बाजू ईश्वर स्मरून पाळण्याविषयीं उत्तेजन दिलें व अनुकूल काळाविषयीं आशा उत्पन्न केली. त्या आशेच्या जोरावर आमचें कुटुंब परमेश्वराच्या कृपेचा धांवा करीत होतें; इतक्यांत परस्थात्यांतला कोंकणी मनुष्य वडिलांच्या जागेवर येऊं इच्छीत होता,

त्याचें पत्र आलें. हुजूर कचेरींतून मंजुरी आली. खऱ्या पक्षानें खोट्याचे नाकावर वाट करून दाखविली. अरेरे! मनुष्यप्राण्याचा काय हा मत्सर! रावसाहेबांची फजीती झाली; तेव्हां त्यांस मोठें दुःख झालें. सरकारी नोकरींतील 'मत्सरी' व 'पैसेखाऊ' व्यक्ति ह्मणजे 'सद्गुणांच्या जागेचा अपमान' होय.

वडील 'कारकुना'चे एक 'अधिकारी' झाले. या एकंदर काहुरांत 'जीवन'च शंकित होतें. तेथें स्वतंत्र अधिकार, बहडती व स्वदेश इतक्या वस्तू मिळण्याची स्वप्नांत देखील आशा नव्हती. पण परमेश्वराजवळ आपण मेहनत करून चांगलें देऊन ठेवलें असलें ह्मणजे तो तें प्रसंगीं दिल्यावांचून कदापि राहणार नाहीं. वडिलांना मागें सांगितलेल्या ज्योतीषाच्या सांगण्याचा पुष्कळ चांगला प्रत्यय आला. तेव्हांपासून ज्योतीषावर त्यांचा विश्वास बसला व तें 'शास्त्र' व्यवस्थित व खरें आहे, अशी त्यांनीं लवकरच आपली खात्री करून

घेतली. पुढें त्यांची बदली इंदापूर येथें झाली. तेथें त्यांस चाळीस रुपये पगार मिळूं लागला.

इंदापुरास आल्यावर अधिकारी पंचायतनांत ते विराजमान झाले. तेथें त्यांस चांगली मंडळी मिळाली. गंजीफा, पत्ते, बुद्धीबळें, सतार वगैरे करमणुकीचा अड्डा सुरू झाला. आतांपर्यंत त्यांना तंबाखू व विडी हीं व्यसनें नव्हतीं, तीं येथें जडलीं. तेथील फडणीस ह्मणत ' अहो, बायकांचें जसें हळदकुंकू तशी पुरुषांची तंबाखू '! वडिलांनीं हौसेनें एक 'तट्टू'ही ठेवलें होतें. मधून मधून सरकारी मंडळीच्या जवळच्या क्षेत्रावर व खेड्यावर स्वाऱ्या होत. हुरड्याचीं आमंत्रणीं व गुऱ्हाळावर मेजवानी यांची चंगळ असे. अशा सुखांत कांहीं काळ गेल्यावर त्यांची बदली बारामतीस झाली.

माझ्या वडील बहिणीचा जन्म कोंकणांत झाला व माझा जन्म इंदापुरास झाला. मी बारामतीस बाळपणीं आलों. आमचें बिऱ्हाड

एका मोठ्या वाड्यांत होतें. त्यांत दुसरीं अनेक लहान लहान बिऱ्हाडें होतीं. शिवाय एक प्रशस्त नारायणाचें देऊळ होतें व जवळच नदी होती. येथें माझ्या चरित्रास प्रारंभ झाला.

या पूर्वपीठिकेचा वृत्तांत कंटाळवाणा झाला किंवा चटकदार झाला, हें मला स्वतःला सांगतां येणें कठीण आहे. मीं त्यांत होईल तितका संक्षिप्तपणा, मुद्देसूदपणा व मनोहरपणा आणण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि ही केवळ काल्पनिक गोष्ट नसल्याकारणानें काल्पनिक व उंची अन्नाची रुची असणाऱ्या वाचकांना ही इकीकत नीरस वाटण्याचा संभव आहे. पण त्याला माझा नाइलाज आहे. जें आहे, तें हें आहे. तें आवडेल त्यांनीं घ्यावें, नको असेल त्यांनीं टाकावें. तथापि एवढ्यावरच थांबूं नका. समग्र वाचा म्हणजे पुढें कसकसा रंग चढत चालला आहे, हें कळेल.

---

## प्रकरण ३ रें.

### गृहशिक्षण.

माझ्या आईचा स्वभाव हौशी असे. तिचें वर्तन धार्मिक व पवित्र असे. तिच्या हृदयांतील श्रेष्ठ मनोवृत्ति अत्यंत जागरूक असत. प्रेम, परोपकार, भूतदया, नम्रता इत्यादिकांचें शिक्षण मला तिच्यापासून चांगलें प्राप्त झालें. तिला लिहितां वाचतां मुळींच येत नव्हतें. पण पुराणांतील बहुतेक कथा तिच्या तोंडपाठ असत. ती एखाद्या प्रसंगाचें वर्णन करूं लागली म्हणजे इतकें मनोरम करी, कीं त्या प्रसंगाचें चित्र प्रत्यक्ष डोळ्यापुढें उभें रहात असे. स्वयंपाक करण्यांत व पक्वान्नें करण्यांत तिचा हातखंडा असे. चैत्रमासांतील हळदकुंकु, भाद्रपदांतील गणपत्युत्सव, थंडीचे दिवसांतील धुंदुरमास, संक्रांतीचा हलवा, व दिवाळीच्या फराळाचे जिन्नस

यांमध्यें टापटीप, डौल व कांहीं नवीनपणा असावा अशाविषयीं तिची पराकाष्ठेची जपणूक असे.

बारामतीस येईपावेतों तिचें स्वातंत्र्य आमच्या आजीच्या ताब्यांत असे. वडील माणसांच्या तंत्रानें वागणें, हा लहानाचा धर्मच आहे. परंतु सून मोठी होऊन घरांतील कारभार पाहूं लागली म्हणजे गृहांतील कारभारसूत्रें सासूनें सुनेच्या स्वाधीन करावीं हा तिचा धर्म आहे. तदनुसार आजीचे हातांतून आईचे हातांत कारभार आला व आजीनें सर्वच कारभारांतील आपलें अंग काढून घेतलें.

वडिलांचा स्वभाव चंचळ होता. त्यांना पहिल्यापासून विचार करण्याची व पोक्त वर्तन ठेवण्याची संवय नसल्याकारणानें प्रसंगविशेषीं आमच्या आईची व त्यांची सुरेख रंजूक झडे.

आजीला अविभक्तकुटुंबपद्धतीमुळें व स्वभावांतील ढणेपणामुळें कारभारांत फारसें समजत

नसे. यामुळें तिच्याशींही आईला कधींकधीं खडाजंगी करण्याचा प्रसंग येई.

अशा स्थितींत माझा मुख्य शिक्षक काय ती आईच होती. चवथ्या वर्षापासून तिनें मला कांहीं देवाचे स्तुतिपर श्लोक शिकविले होते. ते मी संध्याकाळीं पाय धुऊन ह्मणावे; दिव्यास व देवास नमस्कार करावा; सकाळीं आंघोळ करून भस्म लावावें; सूर्यास बारा नमस्कार घालावे; तुळशीस व तुळशींतील देवास पाणी घालावें. 'दुसऱ्याचे घरीं उगीच जाऊं नये; जेवीत असतील तर तेथें उभें राहूं नये; कोणी कांहीं खात असेल, तर त्याजवळ त्याचें खाणें आटपल्यावर जावें; कोणी कांहीं देऊं लागलें तर 'मला नको, आमचे घरीं पुष्कळ आहे' असें ह्मणावें; कोणाचे घरीं जेवावयास गेल्यास कांहीं पदार्थ मागूं नये; पानावर येईल तो खावा;' इत्यादि धडे तिनें गोड बोलून, खाऊ देऊन, उदाहरण देऊन व प्रसंगीं मार देऊन मला शिकविले होते. बाळपणीं जी

संवय लावावी तेंच मुलाचें 'शिक्षण' होय. हें गृहशिक्षण प्रेमळ आईवांचून दुसरें कोण देऊं शकणार आहे? आणि घरावांचून त्याला दुसरी कोणती जागा योग्य आहे?

ईश्वराच्या संबंधानें तिनें माझ्या मनोवृत्तींला जें मनोहर वळण दिलें, त्याची किंमत केवळ अमोल आहे. कोणताही पदार्थ खाण्यापूर्वी तो देवास अर्पण करावा, नवीन अंगरखा किंवा टोपी घातली ह्मणजे प्रथम देवाचे व वडिलमाणसांचे पायां पडावें, असें तिनें मला शिकाविलें होतें. आपणाला सर्व ईश्वरापासून प्राप्त होतें, ह्मणून आपण त्याला नैवेद्य दाखवून जें खावयाचें तें खावें आणि त्याला नमस्कार करून कोणत्याही नवीन वस्तूचा उपयोग करावा, हें आपलें कर्तव्य आहे, असें तिनें माझ्या मनावर बिंबविलें होतें.

तिच्या शिक्षणानें माझा स्वभाव अत्यंत कोंवळा व धार्मिक बनला. टापटीप आणि

औदार्य यांची माझ्या वर्तनावर छाप बसली. माझ्या उत्कृष्ट मनोवृत्ती संवयीनें प्रबळ झाल्या. आणि स्वार्थ, निर्दयपणा, उद्धटपणा, आचरटपणा वगैरे दुर्गुणांस चांगला आळा बसला.

कोणाही वडील माणसास त्याच्या नांवानें तिनें मला हांक मारूं दिली नाहीं. पुरुषास मामा, काका व स्त्रीस काकी, मामी असेंच कांहीं टोपण नांव द्यावें. नांवानें हांक मारणें दांडगे-पणाचें आहे, असें ती ह्मणे.

माझ्या बाळपणच्या खेळाला होईल तितकी सात्विक दिशा लागेल, अशी तिनें काळजी घेतली. खांबाला विद्यार्थी करून त्याला बडव-बडव बडवणारा पंतोजी तिनें मला बनूं दिलें नाहीं. दुसरीं पुष्कळ मुलें हा खेळ खेळत. पण खांबाला व भुईला उगीच झोडपूं नये, त्यांत देव असतो, असें तिनें शिकवावें. एखाद्या देवाची लांकडी मूर्ति मांडावी, त्याला ल्हानसें घर करावें, लिंबाचा पाला आणून त्यावर शोभा करावी,

लिंबोळ्यांचीं हंड्याझुंबरें करावीं, उत्सव करावा, पूजा करावी, प्रसाद वाटावा, लहान मुलींच्या संसाराच्या नाटकांत एखादें पात्र बनावें, झोंपाळ्याची आगगाडी करावी, कधीं मुलें जमवून कचेरी करावी व ती बरखास्त करून मग इटिदांडू खेळावा अशा प्रकारची दिशा बाळपणीं तिनें माझ्या खेळास लाविली.

नंतर हळूं हळूं मुंजीचें वय आलें. त्याबरोबरच शाळेंतील शिक्षणाची जरुरी भासूं लागली. वर्षप्रतीपदेच्या मुहूर्तानें नवा अंगरखा, नवी टोपी व नवी पाटी अशा मोठ्या थाटानें आह्मी शाळेमध्यें प्रविष्ट झालों.

मुंज झाल्यावर पढण्यासाठीं मला तिनें एका गुरूचे स्वाधीन केलें. वेदाध्ययन हें ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य. बदललेल्या परिस्थितींत तें जरी शक्य नाहीं, तरी नित्य लागणारें ब्रह्मकर्म ह्मणजे संध्या, ब्रह्मयज्ञ, पूजा, पुरुषसूक्त व रुद्र इतकें तरी अध्ययन प्रत्येक ब्राह्मणाच्या मुलाला आलें पा-

हिजे, अशी आमच्या आईची इच्छा होती. त्याप्रमाणें माझें सर्व शिक्षण बारामतीस पूर्ण झालें.

माझी मुंज झाल्यावर माझ्या हातुन जवळच्या महादेवास एकादशीस एकादशणी व नारायणाची आरती तिनें करवावी. घरच्या देवाचीही पूजा व आरती वारंवार करण्याचा प्रसंग येई. यामुळें शिकलेलें ब्रह्मकर्म कायम होऊन नेहमीं ताजेंतवाणें राही. या धार्मिक कृत्यांत घालविलेला काळ मोठा आनंददायक वाटतो. तितका आनंद दुसरीकडे कोठेंही आढळत नाहीं.

आईला आमच्या यात्रा करण्याचा फार नाद. यामुळें, लहानपणींच, मला यात्रा फार घडल्या. जेजुरी, मोरगांव आणि पंढरपूर या त्यांतील मुख्य होत. जेजुरीला थंडीच्या दिवसांत गेलों होतों. त्यावेळची बहार मोठी वर्णनीय. मोरगांवच्या गणपतीपुढचा उंदीर नंदीएवढा मोठा आहे. मला वाटलें उंदराएवढा उंदीर असेल. पण माझी ही कल्पना खोटी ठरली. मी तेथें गेल्यावर

त्या उंदरास शोधूं लागलों. मला वाटलें गणपती-नवळच कुठें लहानसें पिटकुलें बसकें असेल. शेवटीं आईस विचारतां शंकानिरसन झालें व पराकाष्ठेचा हर्ष झाला.

हे प्रवास ह्मणजे माझ्या शिक्षणाचा एक भागच होत. रस्त्यानें नानाप्रकारच्या गमती दृष्टीस पडत. बरोबरच्या शेजाऱ्यांचे अप्पलपोटे स्वभाव नजरेस येत. कंटकपणा, सहनशीलपणा व आत्मसंयमन हे धडे त्यांपासून मला चांगले शिकावयास मिळाले.

'देव पाहावयाचा कीं खाऊं खावयाचा,' असा निघतेवेळीं आह्मांस आईचा प्रश्न असे. 'मी कांहीं मागावयाचा नाहीं, 'भूक' 'भूक' करणार नाहीं, रस्त्यानें हट्ट करणार नाहीं,' असा करार करून घेतल्यावर मग ती मला बरोबर नेत असे.

सारांश, मला जें गृहशिक्षण मिळालें तें अत्यंत हितकर होतें. माझ्या मनोवृत्तीस त्यामुळें फार चांगलें वळण लागलें. स्वभाव भाविक,

प्रेमळ व उच्च बनला. आत्मसंयमन करण्याची संवय लागली. चांगल्या गोष्टींचा अभिमान व निंद्य गोष्टींचा तिरस्कार हृदयांत उत्पन्न झाला. कोणीही उणें उत्तर बोललें तर तें सहन करण्याची शक्ति मनाचे अंगीं प्राप्त झाली. आपण आपलें वर्तन निष्कपट व निस्पृह ठेवण्याची संवय लागली. होईल तितका उपसर्ग द्यावयाचा नाहीं अशी वृत्ति बनली.

याशिवाय, 'व्यावहारिक शिक्षण' ही मला प्राप्त होण्याविषयीं तिनें खबरदारी घेतली. तिनें मला वारंवार बाजारांत धाडावें. वजन, माप व भाव याविषयीं नीट चौकशी करण्यास सांगावें. 'चार दुकानें हिंडून माल पहावा, घरीं दाखवायला आणावा, विकत आणतांना नेहमीं परत करण्याचे बोलीनें आणावा,' इत्यादि पुष्कळ उपयुक्त गोष्टी तिनें मला शिकविल्या होत्या.

माझ्या शाळेंतील व घरच्या अभ्यासावर देखरेख ठेवावी व वेळ गमवूं देऊं नये. संस्कृत शिकण्यास मला शास्त्र्याकडे धाडण्याचाही तिनें परिपाठ घातला.

## प्रकरण ४ थें.

### वडिलांची वसईस बदली.

बारामतीस आमचीं नऊ वर्षें मोठ्या सुखांत गेलीं. तेथें स्नेह मोठा चांगला जमला व कित्येक कुटुंबांशीं अत्यंत घरोबा पडला. संघट्टणापासून उत्पन्न होणारी उष्णता म्हणजे प्रेम, आणि हें संघट्टन आमचें तेथें फार पडलें. कामासंबंधीं वडिलावर सर्व मंडळीचा अत्यंत लोभ असे. कारण त्यांचें करणें अत्यंत सरळ असे.

बारामतीस वडिलांच्या वृत्तींत पुष्कळ फरक पडला. त्यांना संस्कृत शिकण्याचा नाद लागला. सतारीच्या बैठकी मोडून पुराणाच्या बैठकी होऊं लागल्या. गाण्याच्या वर्गण्या जाऊन, 'धार्मिक उत्सवा' संबंधींच्या वर्गण्या होऊं लागल्या. तेथील लक्ष्मीनारायणाचा उत्सव त्यांच्या खटपटीनें बराच थाटाचा व व्यवस्थित होऊं लागला.

त्यांची एकनाथ स्वामीवर भक्ति बसली; व फाल्गुन शुद्ध षष्ठीस दर वर्षी पैठणास जाण्याचा त्यांनीं पाठ घातला. ते सकाळीं गीता वाचूं लागले व रात्रीं एकनाथी भागवत वाचूं लागले. रात्रीं पोथीस नवळची व शेजारची पुष्कळ मंडळी जमत; यामुळें तीस मोठा रंग येऊं लागला. त्यांनीं शेवटीं 'स्मार्त' अग्निही घेतला होता. आलेल्या ब्राह्मणांची योग्यतेनुरूप संभावना करण्याचा व त्यांस पंक्तीला घेण्याचा त्यांचा क्रम कधींही ढळला नाहीं.

एकदां पटकीचा वाखा फार जारीनें सुरू झाला. त्या वेळेस गांवकऱ्यांची व अधिकाऱ्यांची पट्टी गोळा करून त्यांनीं पंचांच्या मदतीनें काशीविश्वेश्वरास अनुष्ठान सुरू केलें. शिवाय घरीं एक चांगलें औषध तयार केलें होतें, तें ते सर्व लोकांच्या घरीं जाऊन फुकट देत.

दसऱ्यास व संक्रांतीस पानसुपारीचा समारंभ आमच्याकडे होई. मधून मधून मेजवान्याही होत.

शिवाय कथा, पुराण वगैरे धर्मकृत्यांचेही समारंभ आमच्या घरीं होत.

वडिलांची वसईस बदली झाली, हें कळ-ल्यावर सर्व लोकांस फार वाईट वाटलें. त्यांस पुष्कळ मेजवान्या झाल्या. आह्मांस पोंचवावयास वेशीपर्यंत पुष्कळ मंडळी आली होती व आमच्या वियोगामुळें सर्वांच्या डोळ्यांतून अश्रू आल्यावांचून राहिले नाहीत.

वसईचे लोक कायदेशीर व तुटक, हवा वाईट आणि जवळ मुंबई असल्यानें राहणी खर्चाची ! यामुळें थोडीशी बढती झाली होती तरी तेथें जाण्यास आम्हांस मोठासा आल्हाद वाटला नाहीं.

आम्ही तेथें येऊन पोंचलों. कारकुनानें कांहीं विशेष व्यवस्था केलेली नव्हती, त्यामुळें प्रथमतः एका देवळांत आम्ही उतरलों. मग घर पाहून बिऱ्हाड केलें.

येथें आमच्या कुटुंबांत चहा शिरला. कारण, येथील हवेला चहावांचून होतच नाहीं असें

दिसलें. झाडूवाल्यास देखील चहा प्याल्यावांचून झाडणें सुचत नसे! येथील बरेच लोक पोर्तुगीज लोकांनीं बाटविले आहेत. त्यामुळें बहुतेक कारागीर, मजूर व शेतकरी खिस्ती सांपडतात. भाजीपाल्याला हा गांव चांगला आहे. पण गहूं, बाजरी, तूप वगैरे देशावरचे जिन्नस येथें चांगले मिळत नसत. यामुळें, आमचे फार हाल झाले. त्यांत वाईट हवेचें साह्य होऊन आमच्या कुटुंबांतील प्रत्येक मनुष्य अजारी पडलें. आमचा तेथें स्नेहही फारसा जमला नाहीं. धर्मकृत्याला तो देश सर्वस्वी प्रतिकूलच भासला. लोक तेथें एक प्रकारच्या पाण्याच्या बाटल्या पितांना फार आढळत. तें काय असावें याविषयीं माझा कांहींच तर्क होईना. पुढें तें 'सोडावॉटर' आहे असें मला कळलें.

वसई हें इतिहासप्रसिद्ध ठिकाण असल्यामुळें, मला तें प्रिय वाटे. वसईचा किल्ला, आर्नाळ्याचा किल्ला, व निर्मळ क्षेत्रांतील शंकराचार्यांची समाध हीं स्थळें वसईत व वसईच्या आसपास प्रेक्षणीय

व संस्मरणीय आहेत. मुंबईची दिवाळी पहावयासही आम्ही एकदां गेलों होतों. शिवाय वज्रेश्वरी नांवाचें देवीचें स्थान आम्हीं पाहिलें.

वसईस माझ्या इंग्रजी शिक्षणास प्रारंभ झाला. तीन इयत्तांपर्यंतच शिकण्याची तेथें सोय होती. पुढें माझी रवानगी पुण्यास झाली. इकडे वडिलांचीही बदली लवकरच देशावर झाली. येथपासून कुटुंबाची व माझी ताटातूट झाली, घर पारखें झालें, प्रेमाचीं माणसें दूर झालीं आणि मी निराळ्या वातावरणांत येऊन पडलों.

---

## प्रकरण ५ वें.

### पुण्यांतील तीन वर्षें.

एखाद्या झाडाची खांदी जशी तोडून काढावी, तशी आईबापापासून तोडलेल्या लेंकराची स्थिति असते. घर आणि प्रेम या दोन शब्दांतील सर्व सौख्य त्याला पारखें होतें. रागें भरली, बोलली,

किंवा शिक्षा केली तरी आई ती आईच. तिची सर दुसऱ्यास येणें नाहीं. वसईहून निघतांना मला फार वाईट वाटलें. पण, शिकण्याची उत्कंठा असल्याकारणानें तें दुःख आंवरून धरणें भाग पडलें.

मी पुण्यास एका दूरच्या आप्तांच्या येथें शिकावयास राहिलों. तें घराणें सुशील व घरंदाज अशी त्याची ख्याती आहे. माझ्या बरोबरचे विद्यार्थीही तेथें होते. यामुळें, चढाओढीनें अभ्यास करण्यास व पाहटे उठण्यास मला मोठा हुरूप येई.

मी ज्या वातावरणांत येऊन पडलों, तें धार्मिक व जुन्या चालीचेंच होतें; परंतु त्यांत 'क्रिया' नव्हती, 'वाचाळता' होती. शिवाय, कांहीं सामान्य सुधारक चालींचेंही अनुकरण तेथें थोडेंसें होत होतें. तरी 'सुधारक' पत्र दृष्टीसमोर खपत नव्हतें; आणि सुधारकाची निंदा करण्यांत व वाचण्यांत त्यांस मोठा हर्ष होई.

मला लहानपणापासून 'माझा इतिहास,' 'माझा धर्म,' व 'माझी भाषा' याविषयीं फार

प्रेम व अभिमान वाटे. त्याचप्रमाणें, त्यासंबंधीं चार मंडळी जमून विवेचन व्हावें, विद्वानांचीं व्याख्यानें ऐकावयास जावें, वर्तमानपत्रें व पुस्तकें वाचावींत, उत्सव करावे व करवावे, आणि आपणही स्वतः सभेमध्यें बोलावें व वर्तमानपत्रें व पुस्तकें लिहावींत, ही ईर्षा मला फार लहानपणापासून वाटे. वास्तविक पहातां, ती माझ्या मनांत कां उत्पन्न व्हावी, त्याला काय कारण झालें, तें मला कोणी शिकविलें, याविषयीं मला जर कोणी प्रश्न विचारूं लागेल, तर मला त्याचें कांहींच उत्तर देतां येणार नाहीं. कारण, ती ईर्षा 'कृत्रिम' नाहीं, 'स्वभाविक' आहे. मी ९ वर्षांचा असतां आमचे मामा 'नर्मदा-प्रदक्षिणे'स गेले होते; त्यांची वारंवार खुशालीचीं व चमत्कारिक वर्णनाचीं पत्रें येत. तीं मी आईस वाचून दाखवी व ह्मणे 'मामा जर प्रदक्षिणेहून आल्यावर एक पुस्तक प्रसिद्ध करतील, तर तें मोठें मनोरंजक होईल.' वसईस आल्यावर 'व्यंकटेश स्तोत्र व रुक्मिणी-

स्वयंवर ' यांचें पठण करण्याचा मीं पाठ घातला. हीं दोन्हींही काव्यें रसाळ आहेत. तीं मी वाचूं लागलों; ह्मणजे माझी वृत्ति तन्मय होऊन जाई. मधून मधून मला असेंही वाटे, कीं आपणही अशीं काव्यें लिहावीं. वसईस आमचे शेजारीं एका पुस्तकवाल्याचें दुकान होतें. त्याचा व आमचा अत्यंत घरोबा पडला. यामुळें मी त्याच्या दुकानांत जाऊन वाटेल तें पुस्तक वाचीत बसत असे. वाचनाची स्वाभाविक गोडी येथें दुणावली व वाचनाचें व्यसन लागलें. मराठी भाषेविषयीं प्रेम व अभिमान फार वाटे व शाळेंत त्याविषयांत मी आपला पहिला नंबर कधींही गमावला नाहीं. वसईतील आमच्या शाळेंतील मास्तर मोठे हौशी व गमती असत. त्यांनीं अभ्यास झाल्यावर आह्मांस ' कूटप्रश्न ' घालावे. ते ' शब्दा 'संबंधीं असत. त्यामुळें आमच्या बुद्धीस चांगला व्यायाम मिळे. मराठी वाचनांत व कूटप्रश्नांत ते बक्षिसेंही लावीत. यामुळें मोठी

चढाओढ लागून श्रम करण्यास हुरूप येई. मला चांगल्या वाचनाबद्दल आमच्या गुरूकडून ने-हमीं शाबासकी मिळे व माझी वाहवा होई. एक दिवस आमचे हौशी शिक्षक एके ठिकाणीं जमले आणि त्यांनीं सर्व मुलें एकेठिकाणीं जमविलीं. तेव्हां, एकानें अशी युक्ति काढली कीं, या सर्वांस 'कविता' करण्यास सांगावें. एक तासाची अवधि देण्यांत आली. स्वतः शिक्षकही 'कविता' करा-यास बसले. कोणत्या तरी 'विषयावर' कांहीं तरी कविता करावयाची असें सांगण्यांत आलें होतें. मग, काय 'कविता चमत्कार' दृष्टीस पडला ह्मण-तां! हंसतां हंसतां सर्वांचीं पोटें दुखून आलीं. पैकीं माझी व दुसऱ्या एका मुलाची कविता अर्धवट बरोबर आली व ती गुरुजींनीं सुधारून 'पूर्ण' व 'बरोबर' केली. माझी जी कविता तयार झाली व जी माझी पहिली कविता होय, ती ही:—'मोरोपंत कवी हे होउनियां जात पेश-वाईत, 'आर्या' सुरस तयांच्या निस्म किती हो!

कथेमध्यें येत !' या प्रसंगानें माझी कविता-शक्ति जागृत झाली. मी रोज शाळा सुटल्यावर एकटा बसून 'पेशव्यांवर' इतिहासाच्या आधारें ओंवी-रूप कविता करूं लागलों. मी 'वृत्तदर्पण' शिकलों नव्हतों; यामुळें माझ्या फार चुक्या होत. माझा दुसरा मित्र माझ्यापेक्षां पुष्कळ मोठा व सहावी इयत्ता पास होऊन इंग्रजी शिकावयास आलेला होता. त्यानें मला कविता करण्यास उत्तेजन दिलें व त्या सुधारून देण्याविषयीं आश्वासन दिलें. नारायणराव पेशव्यांच्या कारकीर्दीपर्यंत मीं कविता केल्या होत्या. पुढें, तें तितकेंच राहिलें. पुण्यास आल्यावर मी आमच्या चार मित्रांच्या साह्यानें आमच्या वर्गाची आठवड्याची सभा स्थापन केली. निरनिराळे विषय घेऊन आम्ही वक्तृत्व करूं लागलों. कविता करण्याचा दुसरा प्रसंग आमच्या चवथ्या इयत्तेच्या मास्तरास वर्षाचे शेवटीं पानसुपारीचे वेळचा स्तुतिपर होय. तिसरा प्रसंग पांचुवीचे दाद

मास्तरांचे तडाक्यांतून सुटल्यावर त्यांची निंदा करण्याचा होय. कवितेंत पुष्कळ दोष घडत. पुढें ते संवयीनें नाहींसे झाले. शहरांतील सार्वजनिक व्याख्यानें व सभा यांना आम्ही नियमानें जात असूं. मधली राष्ट्रीयसभेची गडबड आह्मांस मोठी बोधप्रद झाली. इकडे माझा वाचनाचा नाद बळावत चालला. त्यांत भाषणाचा व लेखनाचा नाद यांची भर पडली. यामुळें, माझा स्वभाव व मतें बनून गेलीं.

दोन वर्षेपर्यंत माझी संध्या व पोथी हीं व्यवस्थित सुरू होतीं. पुढें संध्या नळावरच होऊं लागली व पोथीला अजीबाद रजा मिळाली. माझें मन मला खाऊं लागलें. पण, संवयीनें सर्व अंगवळणीं पडतें. ती 'खव खव' नाहींशी झाली.

पुढें पुण्यास प्लेग आला; व म्याट्रिक्युलेशनच्या अभ्यासास मी धुळयास गेलों. तेथें वातावरण पुरें 'अधार्मिक' मिळालें. येथें माझी संध्या अजीबाद सुटली. कांहीं सुधारणा मान्य होऊं लागल्या. व देशाचा, धर्माचा आणि इतिहासाचा शाब्दिक व

पोकळ अभिमान उरला. धुळ्यास व्याख्यानें, सभा आणि उत्सव यांचें वारेंही नव्हतें.

पुण्यांस व धुळ्यास पुष्कळ निरनिराळीं कुटुंबें पहाण्यास मिळालीं. बाह्य सौंदर्यानें माझें मन भुलून गेलें. घरची राहणी व बाहेरची राहणी मी ताडून पाहूं लागलों. मनोवृत्तीचें अंतःसौंदर्य माझे विचारांतून नाहींसें झालें. मला माझ्या घरांतले दोष तेवढे दिसूं लागले आणि बाहेरचे गुण तेवढे दिसूं लागले. मला घरापेक्षां बाहेरचे राहणें आवडूं लागलें, संवयी ! तुझा परिणाम 'धन्य' होय !

प्रवेशपरीक्षा पहिलेच वर्षी उतरली. शाळेंतील विद्यार्थ्याचा जन्म संपला. अज्ञानपणा व ल्हानपणा आटोपला. व तरुणपणास प्रारंभ झाला.

सुधारक व दुर्धारक या दोन्हीही गोटांत माझे पुष्कळ इष्टमित्र व आप्त होते. या दोघांचींही 'वर्मे' मला चांगलीं कळलीं होतीं. मी जेथें जाई तेथें तसा वागे. यामुळें सर्वांचा माझ्यावर अकृत्रिम लोभ जडला होता.

# प्रकरण ६ वें.

## पाठशाळा.

प्रवेशपरीक्षा झाल्यावर मी पाठशाळेंत प्रविष्ट झालों व उच्चशिक्षणाचें सेवन करूं लागलों.

शाळेंतील माझी पाठशाळेसंबंधीं कल्पना आकाशाएवढी उंच होती. तेथील विद्वत्ता, तेथील शिक्षण, तेथील आचार व तेथील विचार सर्वच स्वर्गीय असावेत, अशी माझी कल्पना होती; ती एकप्रकारें खरी व दुसऱ्या प्रकारें खोटी ठरली. ती कशी, तें पुढें पहा.

पाठशाळेंत जाईपावेतों निदान माझ्या सोंवळ्याला तरी रजा मिळाली नव्हती. तेथें गेल्यावर मला असें सांगण्यांत आलें कीं, ही मृत्युलोकची चाल या स्वर्गांत चालूं नाहीं. येथें अंग किंवा डोकें उघडें टाकणें रानटी जनावराचें लक्षण समजतात. पहिलेच दिवशीं स्नानगृहांत

प्रविष्ट झाल्यावर तेथील पद्धतीची मला माहि-ती देण्यांत आली. 'साबण' हें एक स्नानास आवश्यक द्रव्य येथें मानिलें जातें, असें मला कळलें. 'जोडा' हा या स्वर्गीय सांप्रदायाविरुद्ध आहे, असें मला समजावण्यांत आलें. त्याचप्रमाणें 'फ्रॉग' व 'शर्ट' या वांचून तुमचें येथें मिनिटभर देखील चालावयाचें नाहीं, असें माझ्या मित्रांनीं मला सांगितलें. 'केंस ठेवणें' हा येथील शिष्टसांप्रदाय आहे व 'बिन जावळाचा' मनुष्य 'हलका' व कमी बुद्धीचा मानला जातो असें मला सांगण्यात आलें. आंघोळीला 'दोन बकेटें' तरी निदान पाणी घेतलें पाहिजे व आंघोळ झाल्याबरोबर लागलीच कपडे चढविले पाहिजेत, इत्यादि इत्यादि गोष्टी मला शिकविण्यांत आल्या.

भोजनालयांत आल्यावर तेथील अपूर्व देखावा पाहून मला मोठा चमत्कार वाटला. ब्राह्मणाप्रमाणें ताटवाटींत जेवणारा, ख्रिस्त्याप्रमाणें केंस ठेवून

कपडे घालणारा, व शूद्राप्रमाणें बाह्या मागें सारून भुरके मारणारा हा विद्यार्थीवर्ग कोणत्या जातीचा असावा अशी चमत्कारिक शंका अचानक उत्पन्न झाली. इतक्यांत जवळच्या आमच्या मित्रांनीं आह्मांस खूण करून प्रारंभ करण्यास सांगितलें. पहिल्या दिवशींचें तें जेवण मला मोठ्या कष्टानें गेलें. माझी मनोदेवता मला चैन पडूं देईना. कोणतें चांगलें व कोणतें वाईट याविषयीं परस्परविरोधी कल्पनांचा माझे मनोदधींत कल्लोळ उसळला!

पुस्तकालय, वाचनालय, व्यायामालय व शिक्षणालय इत्यादि आलयें पाहून कौतुक, आश्चर्य व आनंद वाटला. मला माझे मित्रांनीं विचारलें, 'तुह्मी कोणता व्यायाम घेतां?' मीं ह्मटलें, 'घरीं असतांना मी 'नमस्कार' घालतों व बाहेर असतांना मी 'तालीम' करितों किंवा फिरावयास जातों.' आमचे मित्र ह्मणाले, 'छी! तुमचे हे व्यायाम येथें बिलकुल कामास पडणार नाहींत.

ते आतां पुरे करा. 'क्रिकेट,' 'टेनिस' किंवा 'बोटिंग' यापैकीं एखादा पसंत करा.' तेव्हां मीं बोटिंग पसंत केलें. कारण, तें माझ्या स्वभावास अनुरूप होतें.

दिवसांमागें दिवस लोटीत चालले. नवीनपणाचें आश्चर्य नाहींसें झालें. माझी वृत्ति स्थिर झाली; आणि न कळत मी माझ्या विद्यालयीन वातावरणाचें अनुकरण करूं लागलों.

मला वाटलें कीं, माझी 'विद्वत्ता' अल्प असल्यानें आपण सभेंत कसें बोलावें, व 'कॉलेज म्यागेझिन' मध्यें कसें लिहावें ! तेव्हां मी माझ्या कॉलेजांतील विद्वान मित्रांविषयीं, लेखकांविषयीं व वक्त्यांविषयीं माहिती काढूं लागलों.

माझ्या मित्रांनीं मला सांगितलें 'ते फार विद्वान गृहस्थ आहेत. तुम्ही त्यांचे नादीं लागूं नका. आधीं अभ्यास करा व चैन भोगा. कुठल्या सभा, व्याख्यानें व लेख घेऊन बसलांत !' यावर मी गप्प बसलों. चकार शब्द वर काढला नाहीं. व माझ्या मित्रांचे बोलण्यास आदरयुक्त मान डोलविली.

पण माझ्यानें रहावेना. मी दुसऱ्या कांहीं मित्रांस 'कॉलेज म्यागेझिन्' संबंधीं हकीकत पुसली. त्यांनीं मला त्यासंबंधीं फारच निराशा उत्पन्न करणारी माहिती दिली; व सांगितलें कीं, 'तुह्मांस जर कांहीं—मराठी किंवा इंग्रजी—लिहिण्याची संवय असेल, तर तुह्मी लिहा. तुमच्या मजकुराचा आदरपूर्वक स्वीकार केला जाईल.'

तेव्हां मीं माझ्या 'पाठशाळेवर'च एक कविता लिहिली व माझ्या एका नूतन परिचित सोबत्यास दाखविली. मी मोठ्या आतुरतेनें त्याच्या अभिप्रायाची आकांक्षा करीत त्याजवळच त्याचेपुढें कागद ठेवून उभा राहिलों होतों. कविता मी होईल तितकी सुंदर करण्याविषयीं प्रयत्न केला होता. यामुळें मला 'शाबासकी' खास मिळणार, असें मी पूर्वीच भाकित केलें होतें. पण, काय! ते गृहस्थ किंचित् नाखुष होऊन ह्मणतात, 'ही कांहीं कविता नव्हे. "व्हर्सिफिकेशन" आहे. त्यांनीं शांतपणानें तो कागद माझे हातीं परत

दिला. तेव्हां माझ्या मनाची अवस्था काय झाली तें सांगणें कठिण आहे.

तथापि, ती कविता दुसऱ्या एका मित्रास फार पसंत पडली. व्यवस्थापकाकडून संपादकाकडेही ती गेली व तिचा स्वीकार करण्यांत आला. 'व्यवस्थापक' मला ह्मणाले, 'तुह्मी आणखी मराठी मजकूर लिहा. मराठीची फार जरुरी आहे. येथें इंग्रजी लिहिणारे पुष्कळ सांपडतात. मराठी लेखक एकही सांपडत नाहीं.'

हें ऐकून मला आश्चर्य वाटलें; आणि आमची आई मराठी कां 'इंग्रजी' याचा मला घटकाभर भ्रम पडला. ती शोचनीय स्थिति पाहून मनाला पराकाष्ठेचें वाईट वाटलें.

भीत भीत आह्मी बरेच पुढें सरसावलों. दोन वर्षें मला व्यवस्थापक कमिटीनें 'मराठी बाजूचे दुय्यम संपादक' नेमिलें. 'कवी' व 'लेखक' अशी माझी प्रसिद्धि झाली.

माझा गणित विषय पहिल्यापासूनच फार

कच्चा ! त्याचा मला फार धाक होता. पाठशाळेंत शिरतांनाच मला ' पाठशाळा ' धार्जिणी होणार नाहीं, अशी माझी मनोदेवता मला सांगूं लागली. यामुळें, विरक्त मनुष्याप्रमाणें माझी कॉलेजांतील हालचालीसंबंधीं स्थिति होती. पुढें माझें भाकित खरें ठरलें! कॉलेजच्या पहिल्याच परीक्षेंत मला गणितानें एकदां, दोनदां व तिसऱ्यानें हिसका दिला. तेव्हां माझें उच्च शिक्षण आटोपलें ! ! !

कॉलेजांतील विद्वत्तेचें माझें अनुमान खोटें ठरलें. अपरिपक्क विचाराच्या व कोंवळ्या मनाच्या विद्यार्थ्यांस फाजील स्वातंत्र्य मिळतें, त्यामुळें श्रेष्ठ मनोवृत्तींची फार हानि होते. क्रमिक पुस्तकें तोंडपाठ करून आमच्या देशांतील तरुण लोक बुद्धीचा पाण्यासारखा व्यय करितात व विक्षिप्त मतें, आणि मनाची व शरीराची अशक्तता यांची जोड करून घेतात. माझ्या पहाण्यांत आमच्या पाठशाळेंतील 'बी. ए.'चे तीन हप्ते निघाले. पण त्यांत करारी देशभक्त व शहाणा असा मला एकही आढळला नाहीं.

कॉलेजांत गेल्यावर मला 'विचार' करण्याची संवय लागली. आजपर्यंत मी स्वतंत्र विचार असा कधीं केला नव्हता. नास्तिक्याचा जडूं पाहणारा रोग मी देशी व विदेशी तत्त्ववेत्त्यांच्या ग्रंथरूप औषधानें दूर केला.

दोन्ही 'बाजू' नीट पाहून मी शुद्धीवर आलों. दोन्ही बाजूंचीं प्रमाणें तोलून मीं प्रमेयें काढिलीं. मी पुन्हां पूर्ण आस्तिक व स्वधर्मशील बनलों. मला माझें घर पुन्हां आवडूं लागलें. परागंदा झालेलें उच्चमनोवृत्तीचें शिक्षण मला येऊन कडकडून भेटलें; व हल्लीं मी माझ्या देशाचा व भाषेचा अत्यंत नम्र सेवक 'कोणणत्याही स्थितींत' माझें 'कर्तव्य' बजाविण्यास 'अनुकूल काळा'ची आकांक्षा करीत 'जगाचे उंबऱ्यावर' येऊन उभा राहिलों आहे.

